| Procedure for cost updation of estimates while accepting tenders. | निविदा स्विकृती करताना अंदाजपत्रक अद्ययावत करतानाची कार्यपध्दती. |
|---|---|

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**,
शासन परिपत्रक क्रः निविदा-०४१०/(१९२/२०१०)/मोप्र-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२, नोव्हेंबर, २०१०

**संदर्भ :-** १) शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.डीपीडब्ल्यू-१९९६/ १६(ब)/ लेखापरिक्षा- दि.२०.०९.१९९७
२) शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.निविदा-११०९/(६३६/१०)/मोप्र-१, दि.०७.०१.२०१०
३) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्र.निविदा-०४१०/(१९२/१०)/मोप्र-१, दि.१९.०५.२०१०
४) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्र. दरसूची-२३१०/(५४/१०)/लपा-२, दि.०३.०६.२०१०
५) शासन शुद्धीपत्रक जलसंपदा विभाग क्र.निविदा-०४१०/(१९२/१०)/मोप्र-१, दि.०४.०८.२०१०

**प्रस्तावना -**

जलसंपदा विभागाच्या निविदा बोलाविण्यात येत असताना प्रचलित दरसूचीनुसार मंजूर अंदाजपत्रकावर आधारित निविदा बोलविण्याची पध्दत आहे. क्वचित प्रसंगी जुन्या मंजूर अंदाजपत्रकावर निविदा बोलावली जाते. काहीवेळेस निविदा सूचना प्रसिध्द केल्यानंतर दरसूची बदलते. अशा परिस्थितीत निविदा स्विकृत करण्यापूर्वी अंदाजपत्रक अद्ययावत करुन अद्ययावत अंदाजपत्रकाशी निविदा देकाराची तुलना करुन, निविदा स्विकृतीबाबतचा निर्णय घेण्यात येतो. याबाबतची कार्यपध्दती शासनाने वेळोवेळी निश्चित केलेली आहे. सदर कार्यपद्धतीमध्ये सुधारणा करण्याच्या दृष्टीने संदर्भ क्र. ३ व ५ येथील शासन परिपत्रके अधिक्रमित करून खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रकः**

**१)** ई निविदा सूचना सबंधीच्या संदर्भीय क्र. २ च्या शासन निर्णयानुसार रु. ९० लाखापेक्षा जास्त किंमतीच्या सर्व निविदेचे बिड डॉक्युमेट वेबसाईटवर देणे बंधनकारक आहे. कंत्राटदारांना दर पृथ्थकरणासहीत अंदाजपत्रकातील सर्व माहिती उपलब्ध होणार आहे, त्यामुळे दर पृथ्थकरण काळजीपूर्वक करावे.

**२)** दरसूची बाहेरील बाबींचे दर कसे ठरवावेत/अद्ययावत करावेत याबाबतच्या सूचना संदर्भ क्र. ४ येथील परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

३) MPW manual para 313 व 315 नुसार निविदा बोलविण्यापूर्वी जुन्या दराने केलेल्या अंदाजपत्रकातील दर प्रचलित दरसूचीनुसार अद्ययावत (Recast) करुन व त्यास तांत्रिक मंजूरी देण्याची जबाबदारी अद्ययावत अंदाजपत्रक मंजूर करण्यास सक्षम असलेल्या अधिकाऱ्यांची राहील.

४) निविदा स्विकृत करणाऱ्या अधिकाऱ्यांनी शासन परिपत्रक दिनांक २०.९.१९९७ व MPW manual Appendix ४२ अनुक्रमांक २० नुसार प्रदान अधिकारापर्यन्त निविदा स्विकाराव्यात व अधिकारापेक्षा जास्त रकमेची निविदा, निविदेवरील अधिक्य सक्षम स्तरावर मंजूरीसाठी सादर करणे बंधनकारक राहील. याबाबत प्रत्येक महामंडळाने नियमाचे काटेकोर पालन करावे.

५) निविदा प्रक्रियेस अंतिम करण्याची मर्यादा MPW manual परिच्छेद २१७ अन्वये स्पष्ट असताना वेळेचा अपव्यय करणाऱ्या व शासनाच्या नियमावलीचे पालन न करणाऱ्या संबंधितास जबाबदार धरुन त्याच्यावर कारवाई करण्यात येईल. याबाबत असे स्पष्ट करण्यात येते की, निविदा कागदपत्रे सादर करणाच्या अंतिम तारखेस जे दर प्रचलित असतील, त्याच दराने अंदाजपत्रक अद्ययावत करावे. अंदाजपत्रक अद्ययावत करुन, निविदा देकाराशी तुलना करावी.

६) अ.क्र.५ प्रमाणे निविदा देकाराशी तूलना करण्यासाठी अंदाजपत्रक अद्ययावत करतांना फक्त दर अद्ययावत करावेत, दर पृथ:करणाच्या तरतूदी / बाबी मधे काहीही बदल करु नये. ( No change in structure of rate analysis) कोणत्याही नविन बाबी अंदाजपत्रकात अंतर्भूत करु नयेत. (No new items to be included) जेणेकरुन बाब / बाबीचे दरात मूलतः वाढ होणार नाही. तथापी दर अद्ययावत करतांना दर पृथ:करणात उदा. वहन अंतरातील बदलामूळे इत्यादीत वाढ नसून घट झाल्याचे निदर्शनास आले असल्यास दर कमी होणार असतील तर त्याप्रमाणे अद्ययावत दर काढून त्याप्रमाणे अंदाजपत्रक अद्यावत करावे.

७) निविदेची किंमत निश्चित केल्यानंतर निविदेची किंमत ही संबंधित अधिका-याच्या निविदा स्विकृतीच्या सक्षमतेमध्ये बसत नसेल तर त्या अधिका-याने सक्षम अधिका-याकडे सदर निविदा सादर करणे आवश्यक आहे व त्या प्रस्तावास त्याच्याकडून मंजूरी घ्यावी. या सूचनांचे अत्यंत काटेकोरपणे पालन होईल याची कृपया दक्षता घेण्यात यावी. सदर बाब ही निविदा प्रस्तावित करणा-या व अधिक्यास मान्यता देणा-या अधिका-याची संयुक्त जबाबदारी असेल. तसेच, सदर परिपत्रकाचे पालन न झाल्याने होणा-या शासनाच्या आर्थिक

नुकसानीचीही जबाबदारी ही संबंधित अधिका-यांची राहील व संबंधित अधिका-यांवर जबाबदारी निश्चित करून कारवाई करण्यात येईल.

८) वरील कार्यपध्दतीचे काटेकोरपणे अवलंबन केले आहे किंवा नाही, हे पाहण्याची जबाबदारी संबंधित मुख्य अभियंता व महामंडळाच्या कार्यकारी संचालकाची राहील.

सदर परिपत्रक शासनाच्या बेवसाईटवर २०१०११०२१५४८४९००१ ठेवण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( दी. धों. भिडे )**
मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव

प्रत,

महालेखापाल १/२, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
खाजगी सचिव, मा. मंत्री, (कृ.खो.पा.म. वगळून) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (कृ.खो.पा.म.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (खारभूमी) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, खारभूमी जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. विधान सभा/ विधान परिषद सदस्य, सर्व
स्वीय सहायक, सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(दवप्र)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(कृपातंल)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(पा), व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक उपसचिव/अवरसचिव/उपअभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रत, आवश्यक कार्यवाहीसाठी,

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग, येरवडा, पुणे.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय अधीक्षक अभियंता
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता
मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ